लोक आवास योजनेखाली झोपडपट्टयांच्या श्रेणीवाढीसाठी अनुदान उपलब्ध करुन देण्याबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्र. लोआयो-१००२/प्र.क्र.२०१/गृनिधो-२,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक : १८ डिसेंबर, २००२**

**संदर्भ** : शासन निर्णय क्र. एचएसजी २००२/प्र.क्र.६०/गृनिधो-१,
दि. ११ ऑगस्ट, २०००

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय गलिच्छ वस्ती सुधार कार्यक्रमाखाली उपलब्ध होणाऱ्या अनुदानाच्या किमान १० टक्के अनुदान नवीन घराच्या बांधकामासाठी किंवा घराच्या श्रेणीवाढीसाठी वापरण्याची तरतूद आहे. त्याकरीता राज्य शासनाने महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणामार्फत झोपडपट्टयांमध्ये राहणाऱ्या अत्यल्प उत्पन्न गटांसाठी मुंबई व्यतिरिक्त राज्यतील इतर ६१ नागरी क्षेत्रामध्ये ५०,००० सदनिका बांधण्यासाठी दि. ११ ऑगस्ट २००० च्या शासन निर्णयाद्वारे लोक आवास योजना सुरु केली आहे. सदर शासन निर्णयाच्या परिच्छेद ३ मध्ये लोक आवास योजना जेथे झोपडपट्टी आहे. तेथे शक्य असल्यास झोपडपट्टी श्रेणीवाढ योजनेअंतर्गत राबविण्यात येईल. अशी तरतूद करण्यात आली आहे. सदर तरतूद राष्ट्रीय गलिच्छ वस्ती सुधार कार्यक्रमाखाली उपलब्ध होणाऱ्या अनुदानाच्या वापरासंबंधी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार विहित करण्यात आलेली आहे. तथापि श्रेणीवाढीसाठी किती अनुदान उपलब्ध करुन द्यावे याबाबत स्पष्ट आदेश नसल्यामुळे त्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

शासनाने लोक आवास योजनेखाली मागासवर्गीय व अमागासवर्गीय यांना उपलब्ध असलेले अनुदान दि. ११ ऑगस्ट, २००२ च्या शासन निर्णयाच्या परि.२ मध्ये विहित

केल्याप्रमाणे अनुक्रमे रु.११,०००/- व रु. १०,०००/- प्रमाणे संपूर्ण अनुदान लाभार्थ्यास पूर्वीच बांधलेल्या सदनिकेच्या श्रेणीवाढीसाठी वापरण्यास हरकत नाही. तथापि श्रेणीवाढीसाठी वापरण्यात येणा-या अनुदानाबरोबर लाभार्थ्यांचा हिस्सा असणे आवश्यक आहे. त्याकरीता झोपडपट्टयांची श्रेणीवाढ करतांना लाभार्थ्यांचा हिस्सा अनुदानाच्या १५ टक्के इतकी रक्कम निश्चित करण्यात येत आहे.

लोक आवास योजनेमध्ये विहित करण्यात आल्याप्रमाणे झोपडयाची श्रेणीवाढ करतांना लाभार्थ्यांने स्वतःचा हिस्सा प्रथम बँकेमध्ये सयुक्त खात्यावर जमा करणे आवश्यक आहे.

लोक अवास योजनेसंबंधीच्या इतर सर्व अटी श्रेणीवाढीच्या प्रस्तावांना लागू होतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

सहि/-

**(व.दा. राठोड)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**